**"महिला व बाल सशक्तीकरण योजनेसाठी" जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीचे विनियोग करण्याबाबत मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक -संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१८/का-०२**

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- २९ मार्च, २०२२.

**संदर्भ :-**

१. महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२००२०/ प्र. क्र.१३१/का-२, दिनांक ३१.०१.२०२२.
२. महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/ प्र. क्र.१३१/का-२, दिनांक २८.०३.२०२२.
३. महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. मबाआ-२०२०/ प्र. क्र.१८/का-२, दिनांक ४.२.२०२१.
४. महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. रामआ-२०२०/ प्र. क्र.२९/का-१०, दिनांक १०.२.२०२१.

**शासन परिपत्रक :-**

राज्यातील महिला व बालकांच्या सर्वांगीण विकासाकरिता जिल्हा नियोजन समितीस नियोजन विभागाकडून मिळणाऱ्या एकूण नियतव्ययाच्या किमान ३% इतका निधी कायमस्वरुपी राखून ठेवणेबाबत मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेने संदर्भाधीन क्र.१ येथील दि.३१.१.२०२२ रोजी शासन निर्णय निर्गमित केला आहे. तसेच संदर्भाधीन क्र.२ येथील दि.२८.०३.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर योजनेंतर्गत प्राप्त निधीचा विनियोग करण्यासाठी जिल्हा परिषदेस अंमलबजावणी यंत्रणा म्हणून मान्यता देण्यात आली आहे.

२. संदर्भाधीन क्र.१ येथील दि.३१.१.२०२२ रोजीच्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.३.४ नुसार सदर योजनेच्या अंमबजावणी बाबतच्या मार्गदर्शक सूचना स्वतंत्र परिपत्रकाव्दारे निर्गमित करण्यात येतील, असे नमूद आहे. त्यानुसार योजनेच्या अंमलबजावणीसाठी खालीलप्रमाणे सर्वसाधारण सूचना देण्यात येत आहेत. :-

- **सर्वसाधारण मार्गदर्शक सूचना :-**

१) सदर योजनेंतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीमधून जिल्हास्तरावर प्राथम्याने महिला व बाल विकास भवनाचे बांधकाम करण्यात यावे.

२) महिला व बाल विकास भवनाच्या इमारतीमध्ये संदर्भाधीन क्र.३ येथील दि.४.२.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्ट-अ मध्ये नमूद केलेली सर्व कार्यालये भवनाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर तेथे स्थानांतरीत करावीत.

३) तथापि, नागरी बाल विकास प्रकल्प अधिकारी कार्यालये ही त्या प्रकल्पाच्या कार्यक्षेत्रातच असणे अपेक्षित असल्याने महिला व बाल विकास भवनाची इमारत ज्या प्रकल्प कार्यालयाच्या कार्यक्षेत्रात आहे, फक्त तेच प्रकल्प कार्यालय भवनाच्या इमारतीमध्ये स्थानांतरीत करावे.

४) विभागाच्या अखत्यारित असलेल्या जिल्हा कार्यक्रम अधिकारी, जिल्हा परिषद यांचे कार्यालय सुध्दा महिला व बाल विकास भवनाच्या इमारतीमध्ये स्थानांतरीत करावे.

५) सदर योजनेच्या लेखाशिर्षाबाबत नियोजन विभागाच्या निर्देशाप्रमाणे कार्यवाही करावी.

६) संदर्भाधीन शासन निर्णय क्र.२ अन्वये सदर निधीचे विनियोजन करण्यासाठी जिल्हा परिषदेस अंमलबजावणी यंत्रणा म्हणून मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार चालू आर्थिक वर्ष २०२१-२२ मध्ये प्राप्त होणारा निधी संपूर्णत: खर्च होण्याच्या अनुषंगाने ती कामे प्राधान्याने जिल्हा परिषदेमार्फत करण्यात यावीत.

७) सार्वजनिक बांधकाम विभाग व जिल्हा परिषद यापैकी यंत्रणा निवडीचे स्वातंत्र्य जिल्हा नियोजन समितीस असेल.

८) सदर निधी अंतर्गत अंगणवाडीसाठी कोणत्याही प्रकारच्या खाद्यपदार्थांची व तत्सम साहित्याची खरेदी अनुज्ञेय राहणार नाही.

९) सदर योजनेंतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीतून करावयाच्या बांधकामासाठी अंमलबजावणी यंत्रणेशी संबंधित अधिकाऱ्यांची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता घेणे व सर्व प्रचलित नियमांचे पालन करणे बंधनकारक राहील.

- **उपयोजना निहाय मार्गदर्शक सूचना :-**

**अ) उपयोजना क्रमांक-अ महिला सबलीकरण व बालक विकास.**

**१. जिल्हास्तरावर महिला व बाल विकास भवनाचे प्राथम्याने बांधकाम करणे :-**

- ३% राखीव निधीमधून प्राधान्याने महिला व बाल विकास भवनाच्या इमारतीचे बांधकाम करणे.
- सदर भवनाच्या बांधकामासाठी जिल्हाधिकाऱ्यांनी प्राधान्याने जागा उपलब्ध करून द्यावी.
- सदर भवनाचे बांधकाम शासनाच्या सर्व प्रचलित नियमांचे पालन करून करावे.

**२. जिल्हा स्तरावर / मोठया धार्मिक स्थळांच्या ठिकाणी शासकीय भिक्षेकरी गृहांचे बांधकाम करणे, अस्तित्वात असलेल्या शासकीय भिक्षेकरी गृहांची दुरुस्ती, बांधकाम व प्रवेशीतांच्या पुनर्वसनासाठी आवश्यक सुविधा निर्माण करणे. :-**

- यासाठी जिल्हास्तरावर/ मोठ्या धार्मिक स्थळांच्या ठिकाणी शासकीय भिक्षेकरी गृहांचे बांधकाम करणे.
- अस्तित्वात असलेल्या शासकीय भिक्षेकरी गृहांचे दुरुस्ती, व प्रवेशितांच्या पुर्नवसनासाठी नाविन्यपूर्ण कार्यक्रम हाती घेणे.

**३. जिल्हा व तालुका स्तरावरील महिला व बाल विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय निरीक्षणगृहे, मुलींची शासकीय वसतीगृहे, महिलांसाठीचे राज्यगृहे, आधारगृहे, संरक्षणगृहे तसेच महिला व बाल विकास विभागाशी संबंधीत गरज असलेल्या इमारतींचे शासन मान्यतेने बांधकाम व दुरुस्ती करणे. :-**

- महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील सर्व शासकीय इमारतींच्या देखभाल व दुरुस्तीसाठी सदर निधीचा विनियोग करता येईल. तसेच सदर गृहांमधील प्रवेशितांच्या पुनर्वसनासाठी सदर निधीचा विनियोग जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेने करता येईल.

**४. जिल्हा व तालुका स्तरावर शासकीय कार्यालये व इमारती मध्ये महिलांकरीता स्तनपानासाठी बंदिस्त कक्षाचे बांधकाम करणे. :-**

- जिल्हा स्तरावरील महिला व बाल भवनाच्या इमारतीत बंदिस्त हिरकणी कक्षाचे बांधकाम करणे बंधकारक आहे. हिरकणी कक्षात आवश्यक फर्निचर व इतर सोयीसूविधा पुरविणे बंधकारक राहतील.

**५. ग्राम / नागरी / प्रभाग / तालुका स्तरावरील बाल संरक्षण समितीमध्ये एकसुत्रिपणा आणण्याच्यादृष्टीने सदर समित्या सक्षम करण्यासाठी आयुक्त महिला व बाल विकास, पुणे यांच्या संहमतीने तरतुद करणे. :-**

- सदर बाल संरक्षण समितीच्या तिमाही बैठकीच्या आयोजनासाठी आर्थिक तरतूद करणे व सदर समितीच्या सक्षमीकरणासाठी तालुकास्तरावर प्रशिक्षण कार्यक्रमाचे आयोजन करणे.

**६. महिला व बालकांचे कायदे / योजनांच्या प्रसिध्दीसाठी तसेच ग्राम बाल संरक्षण समिती (VCPC) चा विस्तार करण्यासाठी ग्रामपंचायतीच्या मासिक सभेतील कार्यसुचीमध्ये (Agenda) समावेश करणे. :-**

- महिला व बालकांचे कायदे आणि योजनांच्या प्रसिद्धीसाठी जिल्हास्तरावर सर्व योजनांची एकत्रित पुस्तिका तयार करणे तसेच कलापथके, पथनाट्याकरिता सदर निधीचा विनियोन करावा. तसेच ग्राम बाल संरक्षण समिती चा विस्तार करण्यासाठी ग्राम पंचायतीच्या मासिक सभेतील कार्यसुची मध्ये समावेश करणेकरिता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना याबाबत कार्यवाही करावी.

**७. देवदासी व त्यांच्या मुलांच्या पुनर्वसनासाठी योजना राबविणे :-**

- ज्या जिल्हयात देवदासी व त्यांच्या मुलांच्या पुनर्वसनाची तातडीने आवश्यकता आहे, अश्या जिल्ह्यांमध्ये देवदासी व त्याच्या मुलांना व्यवसाय शिक्षण व रोजगराभिमुख प्रशिक्षण योजना राबवाव्यात.

**८. कोणत्याही कारणामुळे एक पालक किंवा दोन्ही पालक गमावून अनाथ झालेल्या मुलाबाबत शासनाच्या मान्यतेने योजना राबविणे. :-**

- कोणत्याही कारणामुळे एक किंवा दोन पालक गमावून अनाथ झालेल्या बालकांना व्यवसाय शिक्षण, प्रशिक्षण देणे करीता कौशल्य विकास विभागाच्या माध्यमातून प्रशिक्षण देणेकरीता नाविण्यपुर्ण योजना आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्या मान्यतेने राबवाव्यात. प्राप्त प्रस्तवास मान्यता देण्यासाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

**९. कोणत्याही कारणामुळे पतीचे/ कर्त्या पुरुषाचे निधन होवून एकल/विधवा झालेल्या महिलांच्या पुनर्वसनाबाबत शासनाच्या मान्यतेने योजना राबविणे. :-**

- कोविड किंवा अन्य कोणत्याही कारणामुळे पतीचे निधन होऊन विधवा झालेल्या महिलांकरीता कोशल्य विकास प्रशिक्षण, रोजगाराभिमुख प्रशिक्षण, शिक्षण तसेच व्यवसाय सुरु करणेसाठी प्रशिक्षण देणेविषयी विविध कार्यक्रम आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्या मान्यतेने राबवाव्यात. प्राप्त प्रस्तवास मान्यता देण्यासाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

**ब) उपयोजना क्रमांक-ब महिलांचे आर्थिक सक्षमीकरण :-**

**१) महिला बचतगट मोहिमेच्या बळकटीकरणाकरीता जिल्हा व तालुका स्तरावर शासकीय जागेवर किंवा स्थानिक स्वराज्य संस्थाचे जागेवर महिला बचतगट भवनाचे बांधकाम करणे.**

- स्थानिक स्वराज्य संस्थांनी उपलब्ध करुन दिलेल्या जागेवर महिला व बचत गटांनी उत्पादित केलेल्या मालांना कायमस्वरुपी बाजारपेठ उपलब्ध होणेसाठी महिला व बचतगट भवनाचे बांधकाम करावे. सदर बांधकाम करण्यासाठी शासनाच्या सर्व विभागाच्या सर्व प्रचलित नियमांचे पालन करणे बंधनकारक असेल.

**२) जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्याकरीता प्रत्येक जिल्हयाकरीता वाहने वित्त विभागाच्या प्रचलीत वाहन धोरणानुसार उपलब्ध करुन देणे. सदर वाहन जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी महिला बचत गटांचे उत्पादक वस्तुला स्थानिक बाजारपेठ उपलब्ध होण्यासाठी "समुदाय व्यवस्थापित संसाधन केंद्र (CMRC) करीता महिला आर्थिक विकास महामंडळला (माविम) माल वाहतूकीसाठी आवश्यकतेनुसार उपलब्ध करुन देण्यात येईल.**

- वाहन खरेदी करतेवेळी वित्त विभागाच्या प्रचलित वाहन धोरणातील तरतुदींचे व पर्यावरण विभागाच्या मार्गदर्शक सूचनांचे तंतोतंत पालन करावे.
- वाहनाची खरेदी करताना शक्यतो इलेक्ट्रीक वाहनांच्या खरेदीस प्राधान्य द्यावे.
- सदरचे वाहन हे जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे ताब्यात राहील. त्यांनी महिला आर्थिक विकास महामंडळाच्या समुदाय व्यवस्थापित संशोधन केंद्रास आवश्यकतेनुसार उपलब्ध करुन द्यावे.
- वाहनचालकाच्या उपलब्धततेबाबत शासनाच्या बाह्यस्त्रोताकडून मनुष्यबळ उपलब्ध करून घेणेबाबतच्या धोरणातील मार्गदर्शक सूचनांप्रमाणे कार्यवाही करावी.

**३) महिला बचत गटांच्या उत्पादक वस्तुला सुलभ प्रकारे विक्री होण्याकरीता राष्ट्रीय व राज्य महामार्ग तसेच मुख्य जिल्हा मार्गाला लागून शासकीय जागेत / स्थानिक स्वराज्य संस्थेच्या जागेत लहान स्टॉल बांधकाम करणे.**

- महिला व बचत गटांमार्फत उत्पादित वस्तुंना कायमस्वरुपी बाजारपेठ उपलब्ध होणेसाठी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून जागा उपलब्ध करून घेवून त्या जागेवर स्टॉलचे बांधकाम करावे. स्टॉलच्या बांधकामाबाबत सर्व प्रचलित नियमांचे पालन करावे.

**क) उपयोजना क्रमांक-क एकात्मिक बालविकास सेवा योजना -**

**१. अंगणवाडी केंद्राचे नवीन बांधकाम :-**

- अंगणवाडी केंद्राचे नवीन बांधकाम प्राधान्याने BALA या संकल्पनेवर आधारीत असावे.
- अंगणवाडी केंद्रामध्ये अग्निशमन यंत्रणा बसविणे बंधनकारक असेल.
- अंगणवाडी बांधकामाचे दर शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या दरानुसार राहतील.
- अंगणवाडी बांधकामासाठी ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांनी प्राधान्याने जागा उपलब्ध करुन द्यावी. उपलब्ध जागेवर विहीत कालावधीत इमारत बांधकाम करुन घेणेची जाबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद) यांची असेल.
- अंगणवाडी बांधकामाचे सर्व प्रस्ताव (ग्रामिण / आदिवासी) जिल्हा कार्यक्रम अधिकारी यांनी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या मान्यतेने थेट जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेसाठी सादर करावा.

- अंगणवाडी बांधकामाचे सर्व प्रस्ताव (नागरी) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी नेमून दिलेल्या नोडल अधिकाऱ्याने आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या मान्यतेने थेट जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेसाठी सादर करावा.
- सर्व नागरी प्रकल्पांच्या बाबतीत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी नेमून दिलेल्या नोडल अधिकारी यांच्यावर विहीत कालावधीत बांधकाम पूर्ण करून घेणेची संपुर्ण जबाबदारी राहील.

**२. अंगणवाडी केंद्रांना नलिकेद्वारे पाणी पुरवठा करणे. :-**

- अंगणवाडी केंद्रांना प्राधान्याने नळ जोडणी करुन देण्याची जबाबदारी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांची राहील.
- नळजोडणी दुरुस्ती आवश्यक असलेल्या ठिकाणी दुरुस्तीची कामे घेता येतील.
- जलजीवन मिशन अंतर्गत घेण्यात आलेली कामे दुबार होणार नाहीत याची दक्षता घ्यावी.
- पाणी साठवणूक, पाणी शुद्धीकरण यांची अंगणवाडीत व्यवस्था करावयाची असल्यास अशा कामांचा यात समावेश राहील.
- आवश्यक असल्यास नळजोडणी, दुरुस्ती याबाबत अंदाजपत्रके सादर करणे, मंजुरीनंतर काम पुर्णत्वाची जबाबदारी संबंधित जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास) यांची असेल.
- अंगणवाडी केंद्रांना नलिकेद्वारे पाणी पुरवठा करणेबाबतचे सर्व प्रस्ताव (ग्रामिण / आदिवासी) जिल्हा कार्यक्रम अधिकारी यांनी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या मान्यतेने थेट जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेसाठी सादर करावा.
- अंगणवाडी केंद्रांना नलिकेद्वारे पाणी पुरवठा करणेबाबतचे सर्व प्रस्ताव (नागरी) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी नेमून दिलेल्या नोडल अधिकाऱ्याने आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या मान्यतेने थेट जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेसाठी सादर करावा.
- सर्व नागरी प्रकल्पांच्या बाबतीत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी नेमून दिलेल्या नोडल अधिकारी यांच्यावर विहीत कालावधीत अंगणवाडी केंद्रांना नलिकेद्वारे पाणी पुरवठा करणेबाबतचे काम पूर्ण करून घेणेची संपुर्ण जबाबदारी राहील.

**३. अंगणवाडी केंद्रांना वीजपुरवठा करणे. :-**

- अंगणवाडी केंद्रांना वीजजोडणी करून घेणेबाबतची जबाबदारी संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी यांची राहील.
- अंगणवाडी केंद्रांना वीजपुरवठा करणेबाबतचे सर्व प्रस्ताव (ग्रामिण / आदिवासी) जिल्हा कार्यक्रम अधिकारी यांनी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या मान्यतेने थेट जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेसाठी सादर करावा.
- अंगणवाडी केंद्रांना वीजपुरवठा करणेबाबतचे सर्व प्रस्ताव (नागरी) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी नेमून दिलेल्या नोडल अधिकाऱ्याने आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या मान्यतेने थेट जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेसाठी सादर करावा.

- सर्व नागरी प्रकल्पांच्या बाबतीत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी नेमून दिलेल्या नोडल अधिकारी यांच्यावर विहीत कालावधीत अंगणवाडी केंद्रांना वीजपुरवठा करणेबाबतचे काम पूर्ण करून घेणेची संपुर्ण जबाबदारी राहील.
- वीज जोडणीसाठी प्राप्त होणारी वीज ही पारंपारिक स्रोताऐवजी अपारंपारिक (सौर, पवनचक्की इत्यादी) ऊर्जा संसाधनांव्दारे प्राप्त करुन घेणेबाबत प्राधान्याने कार्यवाही करावी.

**४. अंगणवाडीतील स्वयंपाक गृहाचे आधुनिकीकरण. :-**

- अंगणवाडी केंद्रांमध्ये अस्तित्वात असलेल्या स्वयंपाकगृहात पायाभुत सुविधा (कट्टा, शेल्फ,गॅस शेगडी, स्वयंपाकगृहात आवश्यक साधने) दर्जेदार स्वरुपात उपलब्ध करुन देणे.
- ग्रामीण / आदिवासी प्रकल्पाच्या बाबतीत सदर पायाभुत सुविधा बाबत किमान समान संरचना असेल याची दक्षता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी घ्यावी. तसेच सर्व नागरी प्रकल्पांच्या बाबतीत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी नेमून दिलेल्या नोडल अधिकारी यांची राहील.
- ज्या ठिकाणी स्वयंपाकगृह अस्तित्वात नाही अशा ठिकाणी स्वतंत्र बांधकाम व पायाभुत सुविधांसह स्वयंपाकगृह बांधता येईल.
- अंगणवाडीमध्ये गरम ताजा आहार तयार करण्याच्या प्रक्रियेदरम्यान सर्व अन्न सुरक्षेबाबतच्या सर्व मानकांचे पालन होईल, याबबात दक्षता घ्यावी.

**५. अंगणवाडी केंद्राच्या इमारतीचे विस्तारीकरण :-**

- नविन टाईप प्लॅननुसार नसलेल्या जुन्या इमारतींना आवश्यकतेनुसार स्वयंपाकगृह व अनुषंगिक इमारत विस्तारबाबत बांधकामे यात घेता येतील.
- पर्यवेक्षिका यांचेसाठी विभाग (बीट) स्तरावर कार्यालय तथा प्रशिक्षण हॉल बांधता येईल. शासकीय इमारती उपलब्ध नसलेल्या बाल विकास प्रकल्प अधिकारी कार्यालयांसाठी नवीन इमारती बांधता येतील.

**६. अंगणवाडी केंद्रांच्या इमारतींची विशेष दुरुस्ती -**

- अंगणवाडी केंद्रांच्या इमारतींची विशेष दुरुस्ती ही प्रचलित दरानुसार करण्यात यावी.
- अंगणवाडी इमारत विशेष दुरुस्ती कामांची कमाल मर्यादा २.५ लाख राहील.
- मुळ इमारतीस १० वर्षे पूर्ण झाली असल्यासच विशेष दुरुस्ती प्रस्तावित करता येईल.
- एकावेळी दुरुस्ती केल्यानंतर पुढील किमान ५ वर्षे नव्याने दुरुस्ती प्रस्तावित करता येणार नाही.

**७. अंगणवाडी केंद्रात मातांचे प्रतिक्षागृह बांधकाम :-**

- सदर प्रतिक्षागृह गरोदर महिला / स्तनदा माता यांचेसाठी आरोग्य तपासणी व विश्रांती कक्षाचे बांधकाम शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या दराच्या मर्यादेतच करावे.
- प्राधान्याने जास्त लोकसंख्येची गावे/ ठिकाणे (बाजाराची गावे) अशा ठिकाणी बांधकामे प्रस्तावित करता येतील.
- सदर प्रतिक्षागृहात आवश्यक सोयी सुविधा उपलब्ध करुन देण्यात याव्यात.

**८. अंगणवाडी केंद्रांना संरक्षक भिंत बांधणे :-**

- अंगणवाडी भोवती किमान १ मीटर उंचीच्या संरक्षक भिंतीचे प्राधान्याने बांधकाम करावे.
- संरक्षक भिंत बांधताना आपत्कालिन परिस्थितीचा विचार करावा.

- इतर कोणत्याही सार्वजनिक इमारतीच्या आवारात अंगणवाडी असल्यास व त्या आवारात पुर्वीची संरक्षक भिंत असल्यास फक्त अंगणवाडीसाठी संरक्षक भिंत बांधता येणार नाही. तथापि पुर्वीची संरक्षक भिंत नसल्यास नवीन संरक्षक भिंत बांधता येईल.

**९. वाढ सनियंत्रण साधनांचा पुरवठा व देखभाल खर्च :-**

- वजनकाटा ( बालकांसाठी वजनकाटा ० ते २ वर्ष वयोगटातील बालकांसाठी वजनकाटा २ ते ६ वर्षे वयोगटातील बालके, किशोरी/गरोदर महिला / स्तनदा माता यांच्यासाठी )
  - स्टेडीओमीटर (उंची मापक)
  - इन्फोटोमीटर (लांबी मापक)
  - वाढ विकास तक्ते ( ग्रोथ चार्ट)
- एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयूक्तालयामार्फत निर्देश असल्यास अनुषंगिक साधने उपरोक्त नुसार साधने नव्याने उपलब्ध करणे तसेच उपलब्ध साधने नादुरुस्त असल्यास दुरुस्ती करणे यासाठी निधीचे उपयोजन करता येईल.
- नवीन खरेदी प्रकरणी दोष निवारण कालावधी निश्चित करणे बंधनकारक असेल. दुरुस्ती प्रकरणी एखादे साहित्य एकावेळी दुरुस्त केल्यास पुढील किमान २ वर्षे पुन्हा दुरुस्ती प्रस्तावित करता येणार नाही.
- ग्रामीण / आदिवासी प्रकल्प कार्यालयांनी सदर साधनांची मागणी मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद यांच्या मार्फत सादर करणे बंधनकारक राहील. तसेच खरेदी/दुरुस्ती बाबत जिल्हास्तरावर प्रक्रिया पूर्ण करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.
- सर्व नागरी प्रकल्पांच्या बाबतीत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी नेमून दिलेल्या नोडल अधिकारी यांची राहील.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३२९१६२९२१३४३० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by JAHANGIR KYAMUDDIN KHAN
Date: 2022.03.29 16:37:41 +05'30'

**( जहांगीर खान )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. मा.मंत्री, नियोजन/ वित्त विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

७. मा.मंत्री/ राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
९. सर्व विभागांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
१२. सर्व जिल्हाधिकारी
१३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६. उपायुक्त (महिला विकास)/ (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
१७. सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास (आयुक्तालयामार्फत)
१८. सर्व जिल्हा महिला व व बाल विकास अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
१९. सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. निवड नस्ती, का-०२.